लोथल गुजरात येथील प्रस्तावित राष्ट्रीय सागरी वारसा संग्रहालयात महाराष्ट्र राज्य पॅव्हेलियन निर्मितीसाठी वित्तीय मान्यता देण्याबाबत

# महाराष्ट्र शासन
## पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
### शासन निर्णय क्रमांक : पुवसं-२०२३/प्र.क्र.३४१/सां.का.३

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २८ मार्च, २०२४.

**वाचा :-** १) गृह विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-०६२२/प्र.क्र.४६/बंदरे-२, दि.०५.०१.२०२४
२) संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.संग्रह/महाराष्ट्र राज्य पॅव्हेलियन- लोथल/२०२४/१३३१, दि.२६.०३.२०२४

**प्रस्तावना :-**

भारत सरकारच्या बंदरे, जहाज आणि जलपरिवहन मंत्रालयाकडून लोथल, गुजरात येथे नेशनल मेरिटाईम हैरिटेज कॉम्प्लेक्स (NMHC) तयार करण्यात येत असून त्यात भारताच्या समृद्ध आणि वैविध्यपूर्ण सागरी वारसा प्रदर्शित करण्यात येणार आहे. नेशनल मेरिटाईम हेरिटेज कॉम्प्लेक्स (NMHC) मध्ये समृध्द आणि वैविध्यपूर्ण सागरी वारसा प्रदर्शित करण्यासाठी प्रत्येक राज्याकरिता स्वतंत्र दालन (Gallery/Pavilion) उभारण्याचे प्रस्तावित आहे. मा.केंद्रिय नौवहन मंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली बंदरे, नौवहन व जलमार्ग मंत्रालयाच्या Parliamentary Consultative Committee चा दौरा दि.२१.०२.२०२३ रोजी संपन्न झाला. या दौऱ्याच्या निमित्ताने मा.केंद्रीय नौवहन मंत्री आणि मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र यांच्यात मा.मुख्यमंत्री महोदयांच्या वर्षा निवासस्थानी बैठक संपन्न झाली.

सदर बैठकीमध्ये गुजरात राज्यात लोथल येथे उभारण्याचे नियोजित असलेल्या नॅशनल मेरीटाईम हेरीटेज कॉम्प्लेक्सबाबत चर्चा करण्यात आली. सदर नॅशनल मेरीटाईम हेरिटेज कॉम्प्लेक्समध्ये महाराष्ट्राची स्वतंत्र गॅलरी राहणार आहे. या गॅलरीमध्ये महाराष्ट्राच्या आरमाराविषयी व इतर संबंधित ऐतिहासिक बाबी करण्याबाबत राज्यशासनाने त्वरित कार्यवाही करावी. तसेच नॅशनल मेरीटाईम हेरिटेज कॉम्प्लेक्स मध्ये महाराष्ट्राची स्वतंत्र गॅलरी उभारण्याकरिता पुढील सर्व कार्यवाही सांस्कृतिक कार्य विभागाकडून करण्यात यावी, असा निर्णय या बैठकीत घेण्यात आला. त्यानुसार या कामासाठी सांस्कृतिक कार्य विभागास संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये रु.३९.६० कोटी इतका निधी बंदरे विभागाकडून उपलब्ध करुन देण्यात आला आहे. सदर निधी इंडियन पोर्ट रेल एंड रोपवे कॉर्पोरेशन लिमिटेड यांना ठेव अंशदान स्वरूपात वर्ग करण्याची विनंती संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांनी केली आहे. त्यानुसार रु.३९.६० कोटी इतक्या रक्कमेस वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

गुजरात राज्यात लोथल येथे उभारण्याचे नियोजित असलेल्या नेशनल मेरीटाईम हेरीटेज कॉम्प्लेक्स (National Maritime. Heritage Complex)" मध्ये महाराष्ट्राची स्वतंत्र गॅलरी राहणार आहे. या गॅलरीमध्ये महाराष्ट्राच्या आरमाराविषयी व इतर संबंधित ऐतिहासिक बाबी प्रदर्शित करण्यास तसेच

नेशनल मेरीटाईम हेरिटेज कॉम्प्लेक्स मध्ये महाराष्ट्राची स्वतंत्र गॅलरी उभारण्याकरिता रु.३९,६०,००,०००/- (अक्षरी रुपये एकोणचाळीस कोटी साठ लक्ष मात्र) इतक्या रक्कमेस वित्तीय मान्यता देण्यात येत आहे. हा निधी इंडियन पोर्ट रेल एंड रोपवे कॉर्पोरेशन लिमिटेड यांना ठेव अंशदान स्वरूपात वर्ग करण्यासाठी संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, मुंबई यांना यासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास या संबंधिच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

०२. सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात मागणी क्र.बी -७, (३०५१ १८३५) बंदरे व दिपगृहे, ०२ लहान बंदरे, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना सहाय्य (००) (०२) महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास सहाय्यक अनुदान तरंगती जेट्टी व तत्सम प्रवासी सुविधा पुरविणे (कार्यक्रम) ३५. भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान या लेखाशिर्षाखाली रु.३९.६० कोटी इतका निधी सांस्कृतिक कार्य विभागास ३०५१ १८३५ या लेखाशिर्षाअंतर्गत्त गृह विभागाच्या बीम्स प्रणालीवरील अलोकेशन वर ॲडमिन झेड डी-५ समाविष्ट करुन निधी उपलब्ध करुन देण्यात आला आहे. या निधीतून सदर कामावरील खर्च भागविण्यात यावा.

०३. इंडियन पोर्ट रेल एंड रोपवे कॉर्पोरेशन लिमिटेड यांचा बँक खात्याचा तपशिल खालीलप्रमाणे आहे:-

| अ.क्र. | तपशील | |
|---|---|---|
| 1. | Account Name | Indian Port Rail and Ropeway Corporation Limited- NMHC |
| 2. | Bank Name | State Bank of India |
| 3. | Bank Account Number | 39192704917 |
| 4. | IFSC Code | SBIN0000300 |
| 5. | Bank Address | Mumbai Main Branch, Mumbai Samachar Marg, Horniman Circle, Fort, Mumbai - 400 001 |

०४. सदर निधी ज्या प्रयोजनासाठी वर्ग करण्यात आला आहे, त्याच प्रयोजनासाठी त्याचा वापर होत आहे याची खातरजमा संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांनी करावी व सदर निधी अन्य कालावधीतील उपाययोजनांसाठी व इतर बाबींवर खर्च होणार नाही, याची दक्षता संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांनी घ्यावी.

०५. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांनी उपरोक्त प्रमाणे वितरीत करण्यात आलेल्या निधीचे पूर्ण विनियोजन झाल्याबाबत संबंधित यंत्रणेशी समन्वय साधून उपयोगिता प्रमाणपत्र या विभागाकडे सादर करावे.

०६. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांनी निधी वाटपाचे लेखे, अभिलेखे, नोंदवह्या विहित कार्यपध्दतीनुसार अद्यावत ठेवाव्यात. तसेच झालेल्या खर्चाची महालेखाकार कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी पडताळणी करुन त्याबाबतचे प्रमाणपत्र या विभागाकडे तात्काळ सादर करावे. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीच्या मर्यादेपेक्षा जास्त खर्च होणार नाही, याची दक्षता

नियंत्रक अधिकाऱ्यांनी घ्यावी. वितरीत करण्यात आलेल्या अनुदानातून जर काही रक्कम खर्च पडणार नसेल तर ती रक्कम विहित वेळेत शासनास प्रत्यार्पित करण्यात यावी.

०७. सदरचा निधी हा सशर्त आहे.

०८. गृह (बंदरे) विभागाने संदर्भाधीन शासन निर्णय नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.२५७/१४६१, दिनांक २२.१२.२०२३ व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.०१/२०२४/व्यय-८, दिनांक ०१.०१.२०२४ नुसार निर्गमित केला आहे. त्यानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

०९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२८११२३२१२१२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUMANT DINKAR PASHTE

Digitally signed by SUMANT DINKAR PASHTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT,
2.5.4.20=58694d4cd2bd16f0ab6514fc8598a9aa217e2508455856a701adb1bb6ef9b120, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=AFC006DAAE95D0F2CF7C7F09CA18CF0C9C9363A05E6070B1C03455CF1CB43586, cn=SUMANT DINKAR PASHTE
Date: 2024.03.28 14:48:10 +05'30'

**( सु. दि. पाष्टे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई
मा.मंत्री (सां.का.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.मंत्री (बंदरे) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
वित्त विभाग (व्यय-८/अर्थसंकल्प-११), मंत्रालय, मुंबई
नियोजन विभाग (कार्यासन १४६१), मंत्रालय, मुंबई
अपर मुख्य सचिव (बंदरे), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (सांस्कृतिक कार्य) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र सागरी मंडळ, मुंबई
उप सचिव (सां.का.३) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महालेखापाल - १ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महालेखापाल - २ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
महालेखापाल - १ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य ,मुंबई.
महालेखापाल - २ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य , नागपूर.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
अवर सचिव (रोखशाखा), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
कक्ष अधिकारी (बंदरे-२), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती, सां.का.३